शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम या संस्थेतील विद्यार्थ्यांसाठी वसतीगृहाकरीता इमारत भाडयाने घेण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इभाडे-०९२४/प्र.क्र.३७४/प्रशा-२**
गो.ते. रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०२ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

२) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः ईभाडे-०९२४/प्र.क्र.३७४/प्रशा-२, दिनांक १३.०९.२०२५.

३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/इमारत भाडेतत्वावर/वाशिम /शै-४/१९८१/२०२५, दिनांक १०.०२.२०२५

४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. वैशिवसंमुं/इमारत भाडेतत्वावर घेण्यास -मान्यता/अ-४/१२६१/२०२५, दिनांक १३.०२.२०२५

**प्रस्तावना:-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम ह्या नवनिर्मित संस्थेत वैद्यकीय शिक्षणासाठी प्रवेशित विद्यार्थ्यांना राहण्यासाठी संस्थेचे स्वत: चे वसतिगृह उपलब्ध नाही. त्यामुळे उक्त महाविद्यालयात प्रवेश घेतलेलया विद्यार्थ्यांच्या वास्तव्याची सोय तातडीने होण्याच्या दृष्टीने तसेच राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग यांच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने शासकीय व खाजगी इमारत विद्यार्थ्यांकरीता शासकीय दराने भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम ह्या नवनिर्मित संस्थेमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांकरीता वास्तव्याची सोय तातडीने होण्याच्या दृष्टीने तसेच राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग यांच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने खालील नमूद केल्याप्रमाणे शासकीय व खाजगी इमारती भाडेतत्वावर घेण्यास व त्याकरीता येणाऱ्या वार्षिक खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | संस्थेचे नाव व लेखाशिर्ष | भाड्याने उपलब्ध करुन घ्यावयाच्या इमारतीचा तपशील | क्षेत्रफळ (चौ.मी.) | सा. बा. वि. निश्चित केलेले प्रतिमाह भाडे (जी.एस.टी. व स्थानिक करांशिवाय) | एकूण वार्षिक खर्च (जी.एस.टी. व स्थानिक करांशिवाय) |
|---|---|---|---|---|---|
| १. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम (२२१०K१६८) | अन्न व औषध प्रशासन विभाग, वाशिम यांचे निवासस्थाने, २ नग, प्रकार ३ तळमजला | २५१.६० (तळमजला) | ३९,१६७ | ४,७०,००४ |
| | | अन्न व औषध प्रशासन विभाग, वाशिम यांचे निवासस्थाने, ४ नग, प्रकार २ | २८८.५९ (तळमजला) | ५०,३५३ | ६,०४,२३६ |
| | | अन्न व औषध प्रशासन विभाग, वाशिम यांचे निवासस्थाने, १ नग, प्रकार ४ | १२६.५१ (तळमजला) | २१,५७४ | २,५८,८८८ |
| २. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी (२२१०H५६१) | श्री. दादासाहेब बाजीराव देशमुख, महात्मा फुले एज्युकेशन सोसायटी, परभणी | २३७२.६७ (G+१) | ४,२०,१९० | ५०,४२,२८० |

२. सदर भाडेकरार इमारत महाविद्यालयास उपलब्ध करुन दिलेल्या दिनांकापासून अंमलात येईल व त्याची मुदत ०३ वर्ष कालावधी व त्यानंतर महाविद्यालयाच्या आवश्यकतेप्रमाणे जोपर्यंत शासकीय इमारत उपलब्ध होत नाही तो पर्यंत टप्प्याटप्प्याने मुदतवाढ शासन मान्यतेने करता येईल.

३. याबाबतचा सामंजस्य करार अधिष्ठाता यांनी संस्थास्तरावर करावा.

४. यावर होणारा भाडेपट्टी व जी.एस.टी. खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी (२२१०H५६१) व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम (२२१०K१६८) या संस्थेच्या (१४) भाडेपट्टी व कर या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -१, अनुक्रमांक-१० अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०२११३१००३९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.04.02 16:58:22 +05'30'

(म.गि.जोगदंड)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वाशिम
६. सहायक आयुक्त, अन्न व औषध प्रशासन विभाग, वाशिम.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. श्री. दादासाहेब बाजीराव देशमुख, महात्मा फुले एज्युकेशन सोसायटी, परभणी.
९. निवडनस्ती (प्रशा-२).